वितरण आदेश क्र.८
सन २०१८-१९

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
सहाय्यक अनुदान २०१८-२०१९ (अनिवार्य खर्च)
ऑगस्ट ते डिसेंबर २०१८ (दुसरा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१८/प्रक्र.६८/१८ /१२अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १२ सप्टेंबर, २०१८

वाचा : १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प ३, दि.२ एप्रिल, २०१८.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१८/ प्र.क्र.७० /२०१८/२५, दि.४ एप्रिल, २०१८
३. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. विप्रप्र २०१८/प्र.क्र. ६८ /१८/१२ अ दि.२४ एप्रिल,२०१८

**शासन निर्णय-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकिय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी अमरावती या संस्थेच्या सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.२०.०० लाख व वेतने रु. १००.०० लाख लाख अशी एकूण रु. १२०.०० लाख (अक्षरी रुपये एकशे वीस लाख फक्त) इतकी तरतूद करण्यात आली असून, या तरतूदीपैकी, ७० % च्या मर्यादेत प्रथम नऊ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी मंजूर झाले आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये सदर अनिवार्य सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२ डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेला विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खचासार्ठी तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन याकरिता संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये एप्रिल ते जुलै २०१८ या चार महिन्यांकरिता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या रकमेतून संस्थेच्या आवश्यकतेनुसार वेतनेतरकरिता रु. ४,००,०००/- व वेतनेकरिता रु.१५,००,०००/- असे एकूण रु. १९,००,०००/- (रुपये एकोणीस लाख फक्त ) इतके अनिवार्य सहाय्यक अनुदान ( पहिला हप्ता) मंजूर करण्यात आला आहे.

आता संस्थेंस अनिवार्य (वेतन) व (वेतनेतर) खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ७०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून, अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी रु.३०,००,००० /- (अक्षरी रुपये तीस लाख फक्त) इतके अनिवार्य सहाय्यक अनुदान ( दुसरा हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेला सहाय्यक अनुदान (अनिवार्य खर्च ) (२०७० ०७५५) याखाली सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु. ३०,००,०००/- ( रुपये तीस लाख फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१८-२०१९ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्रक्र.६९/अर्थ-३ दि. २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१२१६०५५९९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
Date: 2018.09.12 16:10:05 +05'30'

**( वि.रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) विभागीय आयुक्त, अमरावती.
४) विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नवीन प्रशासकीय इमारत, तपोवन रोड,अमरावती विद्यापीठासमोर,जिल्हा- अमरावती.
५) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
७) उप कोषागार कार्यालय, अमरावती.
८) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/१२अ).